राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत मौ.जुना धामणगांव (ता. धामणगांव रेल्वे, जि. अमरावती) नळ पाणीपुरवठा योजनेच्या अंदाजपत्रकास सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः ग्रापापु-२०१८/प्र.क्र.१८६/ पापु-१३**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: १७ ऑक्टोबर, २०१८

**वाचा**

१) पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग, शासन निर्णय क्रमांकः नप्रमा-१७१४/प्र.क्र.११२/पापु-१३, दि.०५ ऑगस्ट, २०१४
२) मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, अमरावती यांचे पत्र क्रमांकः मजीप्रा/मुअ/अम/ तांशा-१/१९०६/२०१८, दि. १६ ऑगस्ट, २०१८
३) मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, अमरावती यांचे तांत्रिक मंजूरी आदेश क्रमांकः मुअ/मजीप्रा/अम/रेचिशा/तांमं/१९०५/२०१८, दि.१६ ऑगस्ट, २०१८

**प्रस्तावना:-**

राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत संदर्भाधीन क्र. १ येथील शासन निर्णयान्वये मौ. जुना धामणगांव (ता. धामणगांव रेल्वे, जि. अमरावती) येथील नळ पाणी पुरवठा योजनेच्या रु.१४३०.७३ लक्ष इतक्या ढोबळ खर्चाच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता प्रदान केली आहे. तथापि, जलसंपदा विभागाने Dam Share Cost मधून सूट दिल्याने, कमी दराने निविदा प्राप्त झाल्याने व पाईपच्या किंमतीमधील बचतीमुळे मूळ योजनेच्या प्रशासकीय मंजूरीप्राप्त किंमतीमध्ये रु.४४४.३१ लक्ष इतकी बचत होत आहे. त्यामुळे ग्रामपंचायतीच्या मागणीनुसार उर्वरित गावठाणाकरिता वाढीव वितरण व्यवस्था प्रस्तावित करुन मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, अमरावती यांनी संदर्भाधीन क्र. २ च्या पत्रान्वये रु.१३७७.१४ लक्ष (ढोबळ) इतक्या किंमतीचे सुधारित अंदाजपत्रक प्रशासकीय मान्यतेसाठी शासनास सादर केले आहे. सदर सुधारित अंदाजपत्रकास मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, अमरावती यांनी संदर्भाधीन क्र.३ येथील आदेशान्वये तांत्रिक मान्यता प्रदान केली आहे. त्यानुसार मौ. जुना धामणगांव (ता. धामणगांव रेल्वे, जि. अमरावती) येथील नळ पाणी पुरवठा योजनेच्या सुधारित अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होता.

## शासन निर्णय:-

उपरोक्त प्रस्तावनेत नमुद केलेली वस्तुस्थिती विचारात घेता, मौ. जुना धामणगांव (ता. धामणगांव रेल्वे, जि. अमरावती) येथील नळ पाणी पुरवठा योजनेच्या रु. १३७७.१४ लक्ष (रु. तेरा कोटी सत्त्याहत्तर लक्ष चौदा हजार फक्त) इतक्या ढोबळ किंमतीच्या अंदाजपत्रकास राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत पुढील अटींच्या अधीन राहून सुधारित प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

१) ही योजना महाराष्ट्र जीवन प्राधिकरणामार्फत कार्यान्वित करण्यात येईल.

२) या योजनेच्या मूळ प्रशासकीय मंजुरी दिलेल्या शासन निर्णयातील व तांत्रिक मान्यतेच्या आदेशातील अटी व शर्तीचे काटेकोरपणे पालन करावे.

३) सदर योजना पूर्ण झाल्यावर ती संबंधीत ग्रामपंचायत / जिल्हा परिषदेच्या ताब्यात देण्यात यावी. संबंधीत कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण यांच्यांकडून योजना प्रत्यक्षात पूर्ण झाली आहे, या आशयाची सूचना मिळाल्याच्या दिनांकापासून एक महिन्याच्या आत योजना ताब्यात घेण्यासंबंधी संबंधीत ग्रामपंचायत/जिल्हा परिषद जबाबदार राहील. योजना प्रत्यक्षात पूर्ण झाल्यावर लगेच संबंधित कार्यकारी अभियंता, जिल्हा परिषद व संबधित ग्रामपंचायतीच्या अधिका-यांनी संयुक्तपणे योजनेची पहाणी आयोजित करावी आणि अशा पाहणीत कोणतेही दोष आढळून आल्यास योजना ताब्यात देण्यापूर्वी ते सुधारण्यात यावेत.

४) सन २०१३ मधील CAG च्या अहवालानुसार राज्यातील २१% पाणीपुरवठा योजना या देखभाल दुरुस्ती अभावी वीजदेयके न भरल्यामुळे बंद पडल्या असल्याचे दिसून येते. त्यामुळे सदर योजना आर्थिकदृष्ट्या सक्षम राहण्यासाठी पाणीपट्टी दरामध्ये आवश्यकतेनुसार वेळोवेळी वाढ करण्यात यावी.

५) योजनेची चाचणी घेतल्यानंतर योजना संबंधित ग्रामपंचायतीकडे/जिल्हा परिषदेकडे हस्तांतरित करुन लेखे बंद करण्यात यावेत.

६) योजना राबविणे त्याचे परिरक्षण, दुरुस्त्या (विशेष दुरुस्त्या धरुन) यासाठी दरवर्षी येणारा आवर्ती खर्च भागविण्यासाठी, योजनेतील घसारा किंवा यंत्रसामुग्री नुतनीकरणासाठी संबंधित ग्रामपंचायतीस/ जिल्हा परिषदेस/महाराष्ट्र जीवन प्राधिकरणास शासनाकडून कोणतीही मदत/अनुदान मिळणार नाही.

७) हागणदारी मुक्तीबाबतच्या प्रचलित धोरणानुसार कार्यवाही करण्यात यावी.

८) योजना पुनर्सुधारित होणार नाही, याची जबाबदारी महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाची राहिल.

९) योजनेची कामे विहित कालमर्यादेत पुर्ण होण्याच्या दृष्टीने व वाढीव कामांची आवश्यकता पाहता मूळ योजनेचे काम करीत असलेल्या ठेकेदाराची तयारी असल्यास वाढीव कामे त्याचेकडून करण्यात यावीत. अन्यथा स्वतंत्र निविदा काढण्यात याव्यात.

२. सुधारीत प्रशासकीय मंजुरीमुळे मूळ योजनेच्या किंमतीत रु.५३.५९ लक्ष इतकी बचत होत आहे. सदर बचत होणारा निधी शासनास समर्पित करण्यात यावा.

३. प्रस्तुत योजनेस सुधारीत प्रशासकीय मान्यता ही वित्त विभागाच्या दि. १७/०४/२०१५ च्या क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र. ३०/२०१३/विनियम, भाग-२ या शासन निर्णयातील भाग पहिला, उपविभाग-३ मधील अ.क्र. ६ (सहा) परिच्छेद क्र. २७ (अ) अनुसार विभागास प्रदान करण्यात आलेल्या प्राधिकारानुसार देण्यात येत आहेत.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१०१६१५०७०७५९२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ram Apparao Sabane

Digitally signed by Ram Apparao Sabane
DN: CN = Ram Apparao Sabane, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Water Supply and Sanitation Department
Date: 2018.10.17 13:57:52 +05'30'

**(रा. अ. साबणे)**

**कार्यासन अधिकारी , महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) मा.राज्य मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) अपर मुख्य सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
४) सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, एक्सप्रेस टॉवर्स, मुंबई-२१,
५) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, अमरावती
६) महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा, महाराष्ट्र -१, मुंबई / महाराष्ट्र २, नागपूर.
७) मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, अमरावती.
८) संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, सिडको भवन, बेलापूर, नवी मुंबई
९) संचालक (वित्त), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, सिडको भवन बेलापूर, नवी मुंबई.
१०) कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, अमरावती.
११) निवड नस्ती (पापु-१३)